**सन २०२३-२४ करीता नानाजी देशमुख कृषि संजीवनी प्रकल्पासाठी रु. ११७ कोटी निधी वितरीत करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**कृषि,पशुसंवर्धन,दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**

**शासन निर्णय क्रमांक : नादेकृ ४६२३/प्र.क्र.९७/८-अे**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,

मंत्रालय विस्तार, मुंबई- ४०० ०३२.

दिनांक - ३१ जुलै, २०२३.

संदर्भ:-

१. कृषि व पदुम विभाग शासन निर्णय क्र. हअप्र-७१६/प्र.क्र.८२/राकृवियो कक्ष, दि. १७ जानेवारी, २०१८

२. कृषि व पदुम विभाग शासन निर्णय क्र. नादेकृ-४६२३/प्र.क्र.९७/८अे, दि. १८ मे, २०२३ व दि.१४ जून, २०२३.

३. नानाजी देशमुख कृषि संजीवनी प्रकल्प कार्यालयाचे पत्र क्र.नादेकृसंप्र०९२२/अंदाजपत्र/प्र.क्र.१५८/४४५, दिनांक ०५ जुलै, २०२३.

प्रस्तावना:-

हवामान बदलास अतिसंवेदनशील असलेल्या विदर्भ व मराठवाड्यातील ४२१० गावे तसेच विदर्भातील पूर्णा नदीच्या खोऱ्यातील खारपाण पट्ट्यातील ९३२ गावे अशा एकूण ५१४२ गावांमध्ये ६ वर्ष कालावधीत जागतिक बँकेच्या अर्थसहाय्याने सुमारे रू.४००० कोटी अंदाजित खर्चाचा नानाजी देशमुख कृषि संजीवनी प्रकल्प राबविण्यात येत आहे. तसेच दिनांक १७ फेब्रुवारी, २०२२ च्या शासन निर्णयान्वये नाशिक जिल्हयातील मालेगाव तालुक्यातील सर्व गावांचा समावेश या प्रकल्पामध्ये करण्यास मान्यता देण्यात आली आहे. या प्रकल्पांतर्गत निवडलेल्या गावांमध्ये विविध बाबींची अंमलबजावणी करण्याकरिता संदर्भ क्रमांक २ येथील शासन निर्णयांन्वये सन २०२३-२४ मध्ये एकूण १७६.८० कोटी निधी उपलब्ध करुन देण्यात आला असून सदर निधी खर्ची पडलेला आहे. प्रकल्प संचालक, नानाजी देशमुख कृषि संजीवनी प्रकल्प यांचेकडून संदर्भ क्रमांक ३ च्या पत्रांन्वये प्रस्ताव प्राप्त झाला आहे. त्यानुसार सन २०२३-२४ च्या अर्थसंकल्पीय तरतुदीतून रु.११७ कोटी निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्याबाबत शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे :-

**शासन निर्णय :**

१. सन २०२३-२४ करिता प्रकल्प संचालक, नानाजी देशमुख कृषि संजीवनी प्रकल्प, मुंबई यांना बाह्य हिश्श्याचा रु.११७ कोटी (रु. एकशे सतरा कोटी फक्त) निधी वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. वरीलप्रमाणे नानाजी देशमुख कृषि संजीवनी प्रकल्पाकरिता उपलब्ध करुन दिलेला बाह्य हिश्श्याचा रु. ११७ कोटी (रु. एकशे सतरा कोटी फक्त) निधी वितरीत करण्यात येत असून तो प्रकल्पाच्या बाह्य हिश्श्याच्या पुढील लेखाशिर्षाखाली सन २०२३-२४ मध्ये अर्थसंकल्पीत केलेल्या तरतुदीतून खर्ची टाकावा.

मागणी क्रमांक डी-३,

२४०१ पीक संवर्धन,

(११५) लहान /सीमांत शेतकऱ्यांची आणि शेतमजुरांची योजना,

(००)(००) (०२) हवामान अनुकूल कृषि संजीवनी प्रकल्प, (बाह्य हिस्सा ७०%)

(कार्यक्रम) (२४०१ A६४६)

३३-अर्थसहाय्य

३ या शासन निर्णयाद्वारे उपलब्ध करुन देण्यात येत असलेल्या रु.११७ कोटी (रु. एकशे सतरा कोटी फक्त) निधीचे कोषागारातून आहरण व वितरणाकरीता प्रकल्प संचालक, नानाजी देशमुख कृषि संजीवनी प्रकल्प, मुंबई यांना नियंत्रक अधिकारी आणि वित्त विशेषज्ञ, नानाजी देशमुख कृषि संजीवनी प्रकल्प, मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

४ या शासन निर्णयान्वये उपलब्ध करुन देण्यात आलेल्या निधीचा विहित पद्धतीने तात्काळ विनियोग करण्यात यावा तसेच प्रकल्प संचालक, नानाजी देशमुख कृषि संजीवनी प्रकल्प, मुंबई यांनी ३३-अर्थसहाय्य या उद्दिष्टशीर्षाखाली खर्च झालेल्या रकमांचे उपयोगिता प्रमाणपत्र वेळोवेळी शासनास सादर करावे.

५ प्रकल्प संचालकांनी सदर प्रकल्पांतर्गत खर्ची पडणाऱ्या निधीची जागतिक बँकेकडून सत्वर प्रतिपूर्ती मिळवावी व मिळालेल्या प्रतिपूर्तीबाबत शासनास वेळोवेळी अहवाल पाठवावा.

६ प्रकल्प संचालकांनी सदर प्रकल्पांतर्गत झालेल्या कामाचा प्रगती अहवाल शासनास वेळोवेळी सादर करावा.

७ वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्रमांक अर्थसं २०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दिनांक १२ एप्रिल, २०२३ नुसार विहित केलेल्या अटींची पूर्तता होत असल्याने सदर परिपत्रकानुसार तसेच नियोजन विभागाच्या मान्यतेने व वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक २००/२०२३/व्यय-१, दिनांक २८ जुलै, २०२३ अन्वये मिळालेल्या सहमतीनुसार सदर शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

८ सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३०७३११८३२०९६१०१ असा आहे. हा शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

MAHENDRA SOPAN GHADGE

Digitally signed by MAHENDRA SOPAN GHADGE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT, 2.5.4.20=9847eac29efa7aa62661b16d1619a1bfaf6d99b23ec6836d8d498d0797965898, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=761BD1B7183B95814545ACE2DBF80778C68C7EE4EF46BAA6EA9B8BD1F47C2642, cn=MAHENDRA SOPAN GHADGE
Date: 2023.08.01 11:43:21 +05'30'

**( महेंद्र घाडगे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
२. अपर मुख्य सचिव (नियोजन), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
३. अपर मुख्य सचिव (वित्त) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
४. अपर मुख्य सचिव (कृषि ), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई
५. प्रकल्प संचालक, नानाजी देशमुख कृषि संजीवनी प्रकल्प, मुंबई
६. आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
७. संचालक (नियोजन व प्रक्रिया), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
८. महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र१/२, मुंबई/नागपूर
९. महालेखापाल (लेखा व अ नुज्ञेयता), महाराष्ट्र१/२, मुंबई/नागपूर
१०. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
११. निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई
१२. मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई
१३. उप मुख्य लेखा परिक्षक (वरिष्ठ), स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई
१४. वित्त विभाग (कार्यासन व्यय -१/अर्थसंकल्प-३/अर्थसंकल्प-१३), मंत्रालय, मुंबई
१५. कार्यासन २-अे कृषि व पदुम विभाग मंत्रालय, मुंबई
१६. मा.मंत्री (कृषि) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
१७. निवड नस्ती.